प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (PM-POSHAN) योजनेतंर्गत सर्वसाधारण घटकांतर्गत राज्य हिस्स्याचा निधी पुनर्विनियोजनाव्दारे वितरीत करण्याबाबत (सन २०२२-२३)

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शापोआ-२०२३/प्र.क्र.८६/एस.डी.३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक: २९ मार्च, २०२३

**वाचा:-**

१) वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४ एप्रिल, २०२२

२) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२२-Desk (PMP) दि.०६ सप्टेंबर, २०२२

३) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२२/प्र.क्र.१११/एस.डी.३, दि.११ ऑक्टोंबर, २०२२.

४) केंद्र शासनाचे आदेश क्र. प्र. क्र.३-४/२०२२-Desk (PMP) दि.१४ मार्च, २०२३

५) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्र.शापोआ-२०२२/प्र.क्र.१११/एस.डी.३, दि.२७ मार्च, २०२३.

६) शालेय शिक्षण व क्रिडा विभाग शासन निर्णय क्र.पुनर्वि२८२३/प्र.क्र.४४/अर्थसंकल्प दि.२९/०३/२०२३

**प्रस्तावना :-**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण (पूर्वीची शालेय पोषण आहार) योजनेंतर्गत केंद्र शासनाने संदर्भाधिन दि.१४ मार्च, २०२३ रोजीच्या आदेशान्वये सन २०२२-२३ या आर्थिक वर्षातील केंद्र हिस्स्याकरीता दुसऱ्या हप्त्याचा तसेच, योजनेकरीता अतिरिक्त निधी असा एकूण रु.५११५०.६८ लक्ष इतका निधी राज्य शासनास उपलब्ध करुन दिला आहे. सदर निधीची विगतवारी सर्वसाधारण, अनुसूचित जाती उपयोजना (SCSP) व अनुसूचित जमाती उपयोजना (TSP) या घटकांतर्गत केली आहे. प्रस्तुत योजनेकरीता केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण ६० :: ४० असे आहे. उपरोक्त निधीपैकी सर्वसाधारण घटकांतर्गत केंद्र हिस्स्याचा रु.३८२७०.९४ लक्ष निधी व त्यास समरुप राज्य हिस्साचा रु.२४८२९.७१ लक्ष असा एकूण रु.६३१००.६५ लक्ष निधी वितरीत करणे आवश्यक होते. तथापि, राज्य हिस्स्याच्या लेखाशिर्षाचा सुधारित अर्थसंकल्पिय तरतूदीमध्ये रु.१३५६९.०७ लक्ष इतकी तरतूद वितरणासाठी शिल्लक होती. सबब, केंद्र हिस्स्याचा रु.३८२७०.९४ लक्ष व राज्य हिस्स्याचा

रु.१३५६९.०७ लक्ष असा एकूण रु.५१८४०.०१ लक्ष इतका निधी संदर्भाधिन दि.२७ मार्च, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत केला आहे. तसेच, सर्वसाधारण लेखाशिर्षांतर्गत राज्य हिस्स्याची अवितरीत रक्कम रु.११२६०.६४ लक्ष इतका निधी पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्याची विनंती विभागाच्या अर्थसंकल्प शाखेस करण्यात आली होती. तथापि, विभागातील अन्य योजनांमधील शिल्लक निधी विचारात घेवून अर्थसंकल्प शाखेने रु.५५०३.६४ लक्ष इतका निधी पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव नियोजन विभागामार्फत वित्त विभागास सादर केला होता. तदनुषंगाने वित्त विभागाच्या मान्यतेने अर्थसंकल्प शाखेने संदर्भाधिन दि.२९ मार्च, २०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये सर्वसाधारण लेखाशिर्षांतर्गत राज्य हिस्सा (२२०२ ३८१५) करीता पुनर्विनियोजनाव्दारे रु.५५०३.६४ लक्ष इतका निधी वितरणासाठी उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुषंगाने सर्वसाधारण लेखाशिर्षांतर्गत राज्य हिस्स्याचा रु.५५०३.६४ लक्ष इतका निधी वितरणास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

प्रधान मंत्री पोषण शक्ती निर्माण योजनेसाठी सर्वसाधारण लेखाशिर्षातंर्गत राज्य हिस्स्याकरीता पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध झालेला रु.५५०३.६४ लक्ष (रुपये पंचावण्ण कोटी तीन लक्ष चौसष्ट हजार फक्त) इतका निधी खालील लेखाशिर्षामधून निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सुधारित अर्थसंकल्पित तरतूद | पुनर्विनियोजनाव्दारे उपलब्ध करण्यात आलेला निधी | सदर शासन निर्णयाव्दारे वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|
| १. | मागणी क्रमांक ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०१-प्राथमिक शिक्षण, (०१) (१६) शालेय पोषण आहार (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा) (२२०२ ३८१५), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" | रु. ४५०००.००लक्ष | रु.५५०३.६४ लक्ष | रु. ५५०३.६४ लक्ष |
| | **एकूण** | **रु. ४५०००.०० लक्ष** | **रु.५५०३.६४ लक्ष** | **रु. ५५०३.६४ लक्ष** |

२. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३८९/२०२३/व्यय-५, दि.२७ मार्च,२०२३ व नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५६/१४७१, दि.२४ मार्च, २०२३

तसेच, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, अर्थसंकल्प शाखा यांच्या दि.२९ मार्च, २०२३ रोजीच्या शासन निर्णयास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर निधी केंद्र व राज्य शासनाने वेळोवळी दिलेले निर्देश/आदेश/शासन निर्णय/ परिपत्रक/ सूचना यांना अनुसरुन खर्च करण्यात यावा.

४. सदर निधी विहित कालावधीत खर्च करण्याची दक्षता शिक्षण संचालक (प्राथ.) यांनी घेण्यात यावी. तसेच, सदर निधी खर्च केल्यानंतर याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

प्रस्तुत शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२९१८०६१९८४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD ABAJI PATIL

Digitally signed by PRAMOD ABAJI PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a3b99d57d257e955ed34ca51db1f3c521002555e05c455e86fa1c9c82a1d82b, pseudonym=9D437DB3701DE5FE5D194241FCB9D73DC26031B1, serialNumber=68D5A8ABFFDD75CBA24301AA39C12B40983F304D7267796A32B42D4D558F1A1F, cn=PRAMOD ABAJI PATIL
Date: 2023.03.30 12:40:41 +05'30'

**( प्रमोद पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
४) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानमंडळ, मुंबई
६) सर्व मा. संसद सदस्य/ विधानसभा सदस्य/विधानपरिषद सदस्य
७) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
८) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
९) आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
११) शिक्षण संचालक (माध्य. व उच्च माध्य.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) शिक्षण संचालक (योजना), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) शिक्षण संचालक (प्राथ.), महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) शिक्षणाधिकारी (प्राथ.), जिल्हा परिषद (सर्व)
१५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ , मुंबई/नागपूर
१६) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१७) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई
१८) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई
१९) निवड नस्ती - एस.डी. ३.